**माझी कन्या भाग्यश्री योजनेची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याचे कामकाज आयुक्त, महिला व बाल विकास पुणे यांच्याकडे सोपविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एबावि-२०१६/प्र.क्र .४८/का.६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०७ मार्च, २०१७

वाचा :- (१) महिला व बाल विभाग शासन निर्णय क्र.सुकन्या-२०११/प्र.क्र.१४४/का-३, दिनांक १३ फेब्रुवारी २०१४

(२) महिला व बाल विभाग शासन निर्णय क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.५४ (भाग-२)/का-६, दिनांक २६ फेब्रुवारी २०१६

(३) महिला व बाल विभाग शासन निर्णय क्र.एबावि-२०१५/प्र.क्र.४८/का-६, दिनांक २२ फेब्रुवारी २०१७

**प्रस्तावना :- .**

संदर्भ क्र.१ येथील दिनांक १३ फेब्रुवारी, २०१४ च्या शासन निर्णयान्वये दारिद्रय रेषेखाली जन्मणाऱ्या प्रत्येक मुलीसाठी कुटुंबातील सुकन्या योजना **दिनांक १ जानेवारी** २०१४ पासून **२** अपत्यापर्यंत लागू करण्यात आली होती. मुलींचा जन्मदर वाढविणे, त्यांना शिक्षण देणे व बालविवाहास प्रतिबंध करण्यासाठी सध्या सुरु असलेली सुकन्या योजना विलीन करुन व त्याबाबतचा शासन निर्णय अधिक्रमित करुन **"माझी कन्या भाग्यश्री"** ही नवीन योजना संदर्भ क्र.२ येथील दिनांक २६ फेब्रुवारी, २०१६ च्या शासन निर्णयान्वये **दिनांक १ एप्रिल, २०१६** पासून लागू करण्यात आलेली आहे. सदर योजना दारिद्रय रेषेखालील सर्व कुटुंबात जन्माला येणाऱ्या दोन अपत्य मुलींसाठी लागू असून दारिद्रय रेषेवरील APL कुटुंबात जन्माला येणाऱ्या मुलींसाठी या योजनेतील काही लाभ देण्यात येणार आहेत.

२. माझी कन्या भाग्यश्री ही योजना राबविताना क्षेत्रिय कार्यालयांना येणाऱ्या अडचणी विचारात घेऊन योजनेच्या अंमलबजावणीमध्ये सुस्पष्टता व सुसूत्रता येण्याच्या दृष्टीने संदर्भ क्र.३ येथील शासन परिपत्रक दिनांक २२ फेब्रुवारी, २०१७ अन्वये स्पष्टीकरणात्मक सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. सदर योजना राबविण्याचे कामकाज आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांच्याकडे सोपविण्यात आले होते. तथापि, सुकन्या योजनेतील लाभार्थ्यांची माहिती, निधीची माहिती इत्यादी आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडून अद्यापर्यंत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात आलेली नाही. तसेच सुकन्या योजनेमधील किती लाभार्थ्यांना आयुर्विमा महामंडळाकडून पॉलीसी प्रमाणपत्र देण्यात आले आहे याची माहितीही सादर करण्यात आलेली नाही.

महिलांच्या कल्याणाबाबतच्या सर्व योजना आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयाकडून राबविण्यात येतात. त्यामुळे **सुकन्या योजनेअंतर्गत करण्यात आलेला सामंजस्य करार आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे व भारतीय आयुर्विमा महामंडळ यांचेमध्ये करण्यात आलेला आहे.** माझी कन्या भाग्यश्री या योजनेबाबतचा सामंजस्य करार अद्यापपर्यंत भारतीय आयुर्विमा महामंडळाशी झालेला

नाही. आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई या कार्यालयाकडून महिलांच्या कल्याण विषयक कोणत्याही योजना राबविल्या जात नाहीत. त्यामुळे माझी कन्या भाग्यश्री या योजनेची अंमलबजावणी व सनियंत्रण करण्याचे कामकाज आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडे सोपविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

माझी कन्या भाग्यश्री या योजनेची अंमलबजावणी व संनियंत्रण करण्याचे कामकाज आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई यांचे ऐवजी आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे या कार्यालयाकडे सोपविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी “माझी कन्या भाग्यश्री” या योजनेचा सामंजस्य करार तात्काळ भारतीय आयुर्विमा महामंडळ यांचेसोबत करावा. तसेच आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक ३१ मार्च, २०१६ व तत्पूर्वी जन्मास आलेल्या लाभार्थी मुलींना सुकन्या योजनेअंतर्गत व तद्नंतर माझी कन्या भाग्यश्री या योजनेअंतर्गत लाभार्थ्यांना अनुज्ञेय लाभ तात्काळ मंजूर करावेत. सदर प्रक्रिया १५ मार्च, २०१७ पर्यंत पुर्ण करावी व केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा. तसेच या योजनेचा मासिक प्रगती अहवाल मा. मंत्री, महिला व बाल विकास यांचे विशेष कार्य अधिकारी, यांना सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०७१७००३८५७३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Lalsing Ramchandra Gujar

Digitally signed by Lalsing Ramchandra Gujar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Women And Child Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c3eb5f6c3e4855c5793924cf2a352b44266d360de02a2494e1a64477bf79d694, cn=Lalsing Ramchandra Gujar
Date: 2017.03.09 10:24:18 +05'30'

**(ला. रा. गुजर)**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे स्वीय सहाय्य
६. सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (महिला व बाल कल्याण विभाग), मंत्रालय, मुंबई
८. प्रधान सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा),वित्त विभाग,मंत्रालय, मुंबई
१०. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे

११. आयुक्त,एकात्मिक बाल विकास सेवा योजना, महाराष्ट्र राज्य, नवी मुंबई
१२. सर्व विभागीय आयुक्त
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१५. सर्व महानगरपालिका आयुक्त, महानगरपालिका
१८. सर्व विभागीय उपायुक्त, महिला व बाल विकास
१९. सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी
२०. सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी (नागरी/ग्रामीण/आदिवासी )
२१. सर्व मुख्य अधिकारी, नगरपालिका,
२२. सर्व मंत्रालयीन विभाग
२२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), महाराष्ट्र मुंबई / नागपूर
२३. महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, औरंगाबाद
२४. सर्व उपमुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
२५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
२७. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२८. महिला व बाल विकास विभागातील सर्व कार्यासने
२९. उप सचिव, का-३, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना “माझी कन्या भाग्यश्री” या योजनेसंबंधी असलेल्या सर्व नस्ती व कागदपत्रांसह आवश्यक त्या पुढील कार्यवाहीसाठी हस्तांतरीत.
३०. निवड नस्ती (कार्यासन ६)